**जिल्हा सहकारी कृषी ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँकांच्या (जिल्हा भुविकास बँका) कर्मचाऱ्यांची थकीत देणी अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकिर्ण-०१२३/प्र.क्र. ४९/७-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २८ मार्च, २०२३

**संदर्भ**:- १) शासन निर्णय क्रमांक - एलडीबी-१०१५/ प्र.क्र. २८(शिकाना)/७-स, दि. ९.११.२०२२
२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. १६.०३.२०२३
३) शासन निर्णय क्रमांक - पुनर्वि-२३२३/प्र.क्र.१८/२३/१७स, दि. २४.०३.२०२३

**प्रस्तावना:-**

भुविकास बँकांच्या ३४,७८८ कर्जदार शेतकऱ्यांची ९६४.१५ कोटी रुपयांची कर्जमाफी करुन सदर रक्कम भुविकास बँकांकडून शासनास येणे असलेल्या रक्कमेमध्ये समायोजीत करणे, बँकांच्या कर्मचाऱ्यांची रु. २७५.४० कोटी (रुपये दोनशे पंचाहत्तर कोटी चाळीस लाख फक्त) थकीत देणी अदा करणेबाबतच्या प्रस्तावास मा. मंत्रीमंडळाने दि. २०.१०.२०२२ रोजी मान्यता दिली असून त्यानुषंगाने दिनांक ०९.११.२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

सदर शासन निर्णयानुसार भुविकास बँकांच्या कर्मचाऱ्यांची वेतन व इतर देणी अदा करणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यातील भुविकास बँकांच्या कर्मचाऱ्यांची वेतन व इतर देणी अदा करण्यासाठी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात पुरक मागणीद्वारे मंजूर तरतूदीमधून रु. २७५.४० कोटी (रुपये दोनशे पंचाहत्तर कोटी चाळीस लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सदर तरतूद खर्च करण्यासाठी (V०००४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन) सहकार आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात आले आहे. तसेच लेखाधिकारी अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात आले आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच याबाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

सदर खर्च हा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था,महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या विभागाच्या

मागणी क्र. व्ही-२,
२४२५, सहकार (०१)(०१) सहकार आयुक्त व निबंधक, सहाकारी संस्था (अनिवार्य)
(२४२५ ००११) ५०, इतर खर्च

या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

उक्त निधी वितरीत करताना संदर्भाधीन शासन निर्णय क्र. १ नमूद कार्यपद्धतीचा अवलंब करुन त्यानुसार अटी / शर्तींची तंतोतंत पुर्तता झाल्यानंतरच सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांनी अनुदानाचे वाटप करावे. तसेच सदर योजनेची काटेकोर अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने त्यांनी योजनेचे संनियंत्रण करावे. सदर निधीमधून वितरीत करण्यात आलेल्या रकमेबाबतचा जिल्हा-निहाय तपशीलवार अहवाल प्रतीमहा शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २५३/व्यय-२ दिनांक २३.०३.२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२८१९२३१४६४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2023.03.28 19:28:41 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
**वि.का.अ तथा सह निबंधक,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
४. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव.
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग.
६. अपर मुख्य सचिव (सहकार), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग.
७. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
९. सर्व जिल्हा उपनिबंधक, उप/सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, अमरावती.
१४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद.
१५. महालेखापाल (लेखा व परिक्षा) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१६. संचालक लेखा व कोषागार, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. निवड नस्ती.